**श्रीमती सं.वि.पाटील,सहायक कक्ष अधिकारी यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-१४१६/प्र.क्र.४०/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ ऑक्टोबर, २०२०

<u>वाचा</u> : १) समक्रमांचे दिनांक १७-०२-२०१६ चे आदेश.
२) सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांचे क्रमांक: सांस्कृ/आरआर/ २२७/१९, दिनांक ११-१२-२०१९ चे पत्र.
३) समक्रमांचे दिनांक २५-०२-२०२० चे शासन आदेश.

**<u>शासन आदेश</u>**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १७-०२-२०१६ च्या आदेशान्वये श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी यांची सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांच्या अधिनस्त असलेले, सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे या कार्यालयात "अधिक्षक" या पदावर **<u>चार वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने</u>** नियुक्ती करण्यात आली होती. श्रीमती पाटील, ह्या सदरहू कार्यालयात दिनांक ०१-०३-२०१६ पासून कार्यरत असून त्यांचा ४ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी दिनांक २९-०२-२०२० रोजी समाप्त होत असल्याच्या कारणास्तव. सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ११-१२-२०१९ च्या पत्रात नमूद केलेल्या प्रशासकीय कारणास्तव श्रीमती पाटील यांच्या प्रतिनियुक्तीस ५ व्या वर्षी दिनांक ०१-०३-२०२० पासून पुढील एक वर्षासाठी (दिनांक ०१-०३-२०२० ते दिनांक २८-०२-२०२१ पर्यंत) संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक २५-०२-२०२० च्या आदेशान्वये प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यात आली होती.

२. श्रीमती पाटील ह्यांना ५ व्या वर्षी प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यात आल्यामुळे त्यांचा सदरहू प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक २८-०२-२०२१ **रोजी संपुष्टात येणार होता.**

३. मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील **पदे मोठया प्रमाणात** रिक्त **आहेत.** यास्तव श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी **यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी समाप्त होण्यापूर्वी, त्यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून** श्रीमती पाटील, सहायक कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा आदेशाच्या दिनांकापासून त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्यात येत आहे.

४. श्रीमती सं.वि.पाटील, यांनी आपल्या मूळ विभागात (सामान्य प्रशासन विभागात) तातडीने रुजू होऊन तसा अहवाल या विभागास सादर करावा.

५. विभागीय कार्यालय, सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे यांनी श्रीमती पाटील, सहायक कक्ष अधिकारी यांना त्यांच्या मूळ विभागात रुजू होण्यासाठी तातडीने कार्यमुक्त करावे व दिनांक २०-१०-२०२० नंतर कोणतेही वेतन व भत्ते अदा करु नये.

६. संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, या आपल्या विभागात रुजू झाल्याची वस्तुस्थिती या विभागास तात्काळ कळवावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१६१५१३४८८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VRISHALI VINOD
BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administrative Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba5579800452b60209, serialNumber=6b870a94454e2b13ee0959c3370d5d53d60a17d4b6d3ed6077e40a0f53e7a053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2020.10.16 15:16:10 +05'30'

**( वृषाली वि. भिंगार्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, (संबंधित कार्यालयामार्फत).

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
४. विभागीय कार्यालय, सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे
५. उप सचिव (आस्थापना/का.१९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. सह/उप सचिव (कार्यासन सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. साप्रवि/का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती).